राष्ट्रीय आरोग्य अभियान-
सन २०२०-२१ चा प्रकल्प अंमलबजावणी आराखडा (PIP),
FMR Code ६.२.६.४: Replenishment of ASHA HBNC Kits
**आशा स्वयंसेविका यांच्या HBNC संचामधील साहित्याची पूनापूर्ती करण्यासाठी खरेदी प्रक्रिया राबविण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत..**

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
### शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-१२२०/प्र.क्र.२७/आरोग्य -७

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : २५ ऑगस्ट, २०२०.

**वाचा :-**

१. सहसंचालक (अतांत्रिक), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे पत्र क्र.राआअ /प्रशासकीय मान्यता/एचबीएनसी कीट साहित्य/१२४०८-४०९/२०२०, दिनांक १५.०६.२०२०.
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांची मान्य टिप्पणी दिनांक ०९.०६.२०२०.
३. सहसंचालक (अतांत्रिक),राष्ट्रीय आरोग्य अभियान,मुंबई यांचे पत्र क्र.राआअ /आशा-मोबदला-सुधारित सूचना/२५५५३-५५४/२०२०, दिनांक १६.०७.२०२०.

**प्रस्तावना :-**

राज्यात आशा स्वयंसेविका मार्फत नवजात मृत्यू कमी करण्यासाठी नवजात बालकांची गृह स्तरावर काळजी (HBNC) या कार्यक्रमाची अंमलबजावणी करण्यात येते.सदर कार्यक्रमांतर्गत आशा स्वयंसेविका प्रसुतीनंतर नवजात बालकांच्या घरी जाऊन एचबीएनसी संचामधील साहित्याच्या आधारावर नवजात बालकांची तपासणी करून त्यांना शासकीय आरोग्य संस्थेमध्ये दाखल करणेबाबत तत्काळ संदर्भसेवा देतात. एचबीएनसी संचामध्ये खालील साहित्याचा समावेश असतो.

| Sr.No. | Equipment | Number of Equipment |
|---|---|---|
| 1 | Digital Wristwatch | 1 |
| 2 | Digital Thermometer | 1 |
| 3 | Neonatal Weighing Scale-Tubular Spring type with sling | 1 |
| 4 | Blankets for neonate | 2 |
| 5 | Spoon | 1 |
| 6 | Soap &Soap case | 1 |

राज्यातील आशा स्वयंसेविकांना या पूर्वी हे संच पुरविण्यात आले आहेत. त्यापैकी काही वस्तू नादुरुस्त झाल्यामुळे त्या बदलणे आवश्यक आहे. सन २०२०-२१ च्या प्रकल्प अंमलबजावणी आराखड्यात नवीन संचाची मागणी करण्यात आली होती.तथापि केंद्र शासनाने प्रति आशा रु.३५०/- प्रमाणे ५८८०८ आशा स्वयंसेविकांसाठी रु.२०५.८२ लक्ष एवढी तरतूद केली आहे. या अनुषंगाने या संचामधील नादुरुस्त साहित्याची खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता मिळण्याचा प्रस्ताव सहसंचालक (अतांत्रिक),राष्ट्रीय आरोग्य अभियान,मुंबई यांनी सादर केला आहे.

## शासन निर्णय :-

आशा स्वयंसेविकाच्या उपरोक्त एचबीएनसी संचामधील नादुरुस्त साहित्याचा आढावा सहसंचालक (अतांत्रिक),राष्ट्रीय आरोग्य अभियान,मुंबई यांच्या स्तरावर घेण्यात आला असून सादर संचामधील पुढे नमूद केलेल्या साहित्याची खरेदी प्रक्रिया खरेदी कक्षामार्फत राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.:-

| अ.क्र. | साहित्य | अंदाजे दर (रु.) | आवश्यक संख्या (नग) | अंदाजे एकूण किमत (रु.) |
|---|---|---|---|---|
| १ | डिजिटल वॉच | २५० | २५५६४ | ६३९१००० |
| २ | थर्मामीटर | २०० | २४७७१ | ४९५४२०० |
| ३ | वजनकाटा | ३५५ | १७४४५ | ६१९२९७५ |
| ४ | साबण (तीन ) | ५० | ६०८७७ (३) | ३०४३८५० |
| | | | **एकूण** | **२०५८२०२५** |

०२ प्रकल्प अंमलबजावणी आराखडा २०२०-२१, FMR Code ६.२.६.४ अंतर्गत आशा स्वयंसेविका यांच्या एचबीएनसी कीट मधील साहित्याच्या पूनपूर्तीसाठी (Replenishment) रु.२०५.८२ लक्ष एवढी तरतूद करण्यात आली आहे.त्यामधून सदर बाबीवर होणारा खर्च भागविण्यात यावा.

०३. सदर प्रशासकीय मान्यता ही पुढील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.:-

१. सदर बाबींच्या खरेदीची आवश्यकता /मागणी याची शहनिशा/खातरजमा करण्यात यावी. तदनंतरच सदर बाबींची निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.
२. सदरहू बाबींचे विनिदेश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. सदरहू बाबींचे तांत्रिक विनिदेश ( Technical Specifications) संबंधित तज्ञांनी ( तांत्रिक समिती /अधिकारी )यांनी मान्य केलेल्या विनिदेशानुसारच असावेत.तसेच,सदर तांत्रिक विनिदेश (Technical Specifications) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रीतीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. प्रकल्प अंमलबजावणी आराखड्यात (PIP) मंजूर असलेल्या बाबींच्या तांत्रिक विनिदेशानुसार मागणीपत्र

पाठविण्याची जबाबदारी संबंधित कार्यक्रम प्रमुखांची राहील.प्रस्तावात समाविष्ट बाबींवरच निविदा प्रक्रिया करण्यात यावी.

३. शासन निर्णय,उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,क्रमांक भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग -३/ उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६ अन्वये प्रसिद्ध करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपद्धतीची सुधारित नियमपुस्तिका यामधील तरतुदीनुसार विहित निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

४. खरेदी प्रक्रीयेअंती दर निश्चित करण्यात यावा.सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबबत आणि संबधित पुरवठादाराने या बाबींचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

५. सदरहू बाबींसाठी होणारा खर्च हा सन २०२०-२१ च्या मंजूर प्रकल्प अंमलबजावणी आराखड्यातील FMR Code ६.२.६.४ अंतर्गत रुपये २०५.८२ लक्ष ह्या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. तसेच या बाबींची द्विरुक्ती (Duplication) होणार नाही याची दक्षता घ्यावी.

७. सदर बाबींबाबत पुरवठापूर्व/पुरवठाउत्तर नमुना याछुद्रिक तपासणी (Pre/Post dispatch random sample inspection) करून ते प्रमाणित विनिदेशानुसार असल्याची खात्री करून घ्यावी.

८. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र २०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनिमय, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उपविभाग-२ मधील अ.क्र.४, नियम क्र.७ समोरील स्तंभ क्र.६ येथील अटींची पूर्तता करण्यात यावी.

९. निविदा प्रक्रिया पूर्ण झाल्यावर खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमित करण्यात यावेत.

१०.शासन निर्णय,सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.खरेदी २०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७ मधील तरतुदीनुसार कार्यवाही करण्यात यावी.

११.संपूर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

३. उपरोक्त अनुक्रमांक १ ते ११ येथील अटींची पूर्तता व खरेदी नियमानुसार व आवश्यकतेनुसार आहे हे सुनिश्चित करण्याची जबाबदारी आयुक्त आरोग्यसेवा तथा अभियान संचालक राष्ट्रीय आरोग्य अभियान,मुंबई व सम्बन्धित कार्यक्रम प्रमुख यांची राहील.

४. शासन निर्णय,वित्त विभाग, क्र.विअप्र २०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनिमय, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उपविभाग-२ मधील अ.क्र.४, नियम क्र.७ अन्वये अवजारे, किरकोळ साधन सामुग्री आणि उपक्रम संच विकत घेण्यास मंजुरी देण्यासाठी प्रशासनिक विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००८१९१२००१२४५१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Milind Raghunath Kulkarni

Digitally signed by Milind Raghunath Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=438fa70bb728385b5c81bde24450c11d5ce0d99ed18a61fb5b1685722e2c2c03, cn=Milind Raghunath Kulkarni
Date: 2020.08.25 16:48:34 +05'30'

**( मिलिंद कुळकर्णी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत:-

१. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक,राष्ट्रीय आरोग्य अभियान संचालक, मुंबई,
२. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई/ पुणे,
३. संचालक (वित्त व लेखा ), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई,
४. अतिरिक्त संचालक, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे,
५. सर्व सहसंचालक ( आरोग्य सेवा आयुक्तालयामार्फत )
६. उपसंचालक, सर्व मंडळ कार्यालये,
७. सर्व जिल्हा शल्य चिकित्सक (FWB मार्फत)
८. जिल्हा आरोग्य अधिकारी (FWB मार्फत)
९. निवड नस्ती (कार्यासन-आरोग्य-७).